**जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांना पूर्व तयारी व क्षमताबांधणी करिता सन २०२५-२६ करिता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग, (आपत्ती व्यवस्थापन प्रभाग)**
**शासन निर्णय क्रमांक :- आव्यप्र-२०२५/प्र.क्र.२५/आव्यप्र-१**
मादाम काम मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०९ मे २०२५

**संदर्भ** :- १. महसूल व वन विभागाचे शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२४/प्र.क्र. ९३/ आव्यप्र१, दि.११.०७.२०२४
२. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि. ०७.०४.२०२५

**प्रस्तावना :-**

आपत्ती व्यवस्थापन अधिनियम,२००५ च्या तरतूदीनुसार मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाची स्थापना करण्यात आलेली आहे. आपत्तीप्रसंगी प्रतिसाद देणाऱ्या यंत्रणांचे सक्षमीकरण करणे ही प्राधिकरणाची मुख्य जबाबदारी आहे. तसेच, या अधिनियमाच्या कलम २२ व २४ मध्ये राज्य कार्यकारी समितीच्या जबाबदाऱ्या नमूद केल्या आहेत. यामध्ये आपत्तीला सक्षमपणे तोंड देण्याकरिता करावयाच्या उपाय योजना व कार्ये नमूद करण्यात आली आहेत. त्याचप्रमाणे, दि. १९ नोव्हेंबर, २०२० रोजीच्या केंद्रीय गृह मंत्रालयाच्या पत्रान्वये आपत्तीला योग्य प्रतिसाद देण्यासाठी राज्य आपत्ती धोके व्यवस्थापन निधी (SDRMF) या नावाने राज्य आपत्ती प्रतिसाद निधीपैकी पूर्व तयारी व क्षमता बांधणीसाठी स्वतंत्र निधी राखीव ठेवण्याबाबत निर्देश देण्यात आलेले आहेत.

उपरोक्त संदर्भानुसार आपत्ती व्यवस्थापनांतर्गत आपत्तीमुळे निर्माण होणारे धोके व नुकसान कमी करण्याकरिता उचित प्रतिबंधात्मक उपाययोजना, सौम्यीकरण उपाय, पूर्वतयारी व क्षमता बांधणी, प्रशिक्षण व जनजागृती, शोध व बचाव कार्य, आपत्ती व्यवस्थापना संबंधित साहित्य खरेदी, दुरुस्ती या करिता राज्यातील जिल्ह्यांना निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आपत्ती व्यवस्थापन अधिनियम, २००५ च्या कलम ३१ प्रमाणे जिल्हा आपत्ती व्यवस्थापन आराखडा तयार करुन त्यानुषंगाने आपत्ती व्यवस्थापनांतर्गत आपत्तीमुळे निर्माण होणारे धोके व नुकसान कमी करण्याकरिता उचित प्रतिबंधात्मक उपाययोजना, सौम्यीकरण उपाय, पूर्वतयारी व क्षमता बांधणी, प्रशिक्षण व जनजागृती, शोध व बचाव कार्य, आपत्ती व्यवस्थापना संबंधित

साहित्य खरेदी/ दुरुस्ती या करिता जिल्हांना सन २०२५-२६ या वर्षाकरिता ३६ जिल्ह्यांना सोबत जोडलेल्या प्रपत्राप्रमाणे रु. २२,५०,००,०००/- ( अक्षरी रू. बावीस कोटी पन्नास लक्ष फक्त ) एवढा निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर निधी करीता जिल्हाधिकारी यांना नियंत्रक अधिकारी व निवासी उपजिल्हाधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

उपरोक्त प्रमाणे निधी वितरण करिता खालील अटी व शर्ती लागू राहतील

**अटी व शर्ती :-**

१. सदर आदेशान्वये वितरीत करण्यात आलेला निधी संदर्भाधीन शासन निर्णय दि. ११.०७.२४ अन्वये विहित केलेल्या मानक कार्यपद्धतीप्रमाणे खर्च करावा.
२. सदर खर्च वित्त विभागाच्या शा. नि. दि. ०७.०४.२०२५ रोजीचे महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२५ निधी वितरण मधील अटीची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.
३. आपत्कालीन परिस्थितीत अथवा आकस्मिक बाबीवर शासनामार्फत उपरोक्त प्रमाणे ठरवून दिलेल्या खर्च मर्यादेपेक्षा जास्त खर्च करणे आवश्यक असल्यास त्यासाठी जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाची पूर्वमंजुरी अथवा कार्योत्तर मंजूरी घेणे आवश्यक राहील.
४. वित्तीय वर्ष पूर्ण झाल्यानंतर ३० दिवसाच्या आत जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांच्या सही व शिक्क्यासह उपरोक्त तक्त्यानुसार ज्या बाबींवर खर्च करण्यात आला आहे, त्याची तपशीलवार माहिती, अंतर्गत लेखापरीक्षण अहवाल तसेच निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे, जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांना बंधनकारक राहील.
५. अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहारीत करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी / शर्तीचे पालन करावे.

सदर खर्च सन २०२५-२६ करिता मागणी क्र.सी-६ (९१) (०१) पूर्व तयारी व क्षमताबांधणी (वित्त आयोग) (अनिवार्य) मुख्य लेखाशिर्ष २२४५ ४१८८, ३१-सहाय्यक अनुदान (सशर्त) या लेखाशिर्षाखाली वितरीत केलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावा.

प्रस्तुत शासन आदेशातील रक्कम जिल्हाधिकारी कार्यालय तथा जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांना सोबतच्या प्रपत्रामधील तक्त्यानुसार रु २२.५० कोटी इतकी रक्कम बीडीएस प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. त्यामध्ये नागरी संरक्षणाच्या दृष्टीने संवेदनशील ठाणे, नाशिक, पालघर, मुंबई शहर, मुंबई उपनगर, पुणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग या जिल्ह्यांना प्रत्येकी १ कोटी तर इतर जिल्ह्यांना रु. ५० लक्ष याप्रमाणे निधी वितरण करण्यात येत आहे.

६. सध्याच्या उद्भवलेल्या आपत्तीजन्य परिस्थिती मध्ये आवश्यक तेथे आपत्ती व्यवस्थापन अधिनियम २००५ च्या कलम ५० अन्वये कार्यवाही करण्यास जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २७१/२५, व्यय-९, दि. ०९.०५.२०२५ तसेच, वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थस-२०२५/ प्र.क्र.४४/अर्थ-३ दि.०७ एप्रिल २०२५ अन्वये केलेल्या निधी वितरणाच्या आदेशानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२५०५०९१७१६०७०३२६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशनुसार व नावाने,

ARUN CHANGDEO KOLHE

Digitally signed by ARUN CHANGDEO KOLHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=5954cbf120ac1f332056b65de0d4dfa85b619ad7d64fcd736ceb3dee77603425, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7AB6FCE2D956CE4C6E9BFC3EA1AB5FC2F17BEA07DB8AF21ACA4BEDED302CE9F9, cn=ARUN CHANGDEO KOLHE
Date: 2025.05.09 17:17:16 +05'30'

**( अरुण कोल्हे )**
**वित्तीय सल्लागार तथा सहसचिव**

**प्रत-**

१. महालेखापाल, (महाराष्ट्र) मुंबई/नागपूर
२. सर्व विभागीय आयुक्त
३. सर्व जिल्हाधिकारी
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
६. अवर सचिव, (अर्थसंकल्प), आपत्ती व्यवस्थापन प्रभाग महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी सदर निधी क्षेत्रीय नियंत्रक अधिकाऱ्यांना बिम्स प्रणालीवर वितरित करण्याची कार्यवाही करावी.
७. कक्ष अधिकारी, कार्यासन म-११, मदत व पुनर्वसन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. कक्ष अधिकारी, (व्यय-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती / आव्यप्र-१.

**महसूल व वन विभाग, ( आपत्ती व्यवस्थापन प्रभाग ) शासन निर्णय क्रमांक :-**
**आव्यप्र-२०२५/प्र.क्र.२५/आव्यप्र-१, दि. ०९.०५.२०२५ सोबतचे प्रपत्र :-**

| अ.क्र | जिल्हा | सन २०२५-२६ मधील वितरित करावयाचा निधी (रु.लाखामध्ये) | शेरा |
|---|---|---|---|
| १ | अकोला | ५० | |
| २ | अमरावती | ५० | |
| ३ | अहिल्यानगर | ५० | |
| ४ | कोल्हापूर | ५० | |
| ५ | गडचिरोली | ५० | |
| ६ | गोंदिया | ५० | |
| ७ | चंद्रपूर | ५० | |
| ८ | छत्रपती संभाजीनगर | ५० | |
| ९ | जळगाव | ५० | |
| १० | जालना | ५० | |
| ११ | ठाणे | १०० | |
| १२ | धाराशिव | ५० | |
| १३ | धुळे | ५० | |
| १४ | नंदुरबार | ५० | |
| १५ | नांदेड | ५० | |
| १६ | नागपूर | ५० | |
| १७ | नाशिक | १०० | |
| १८ | परभणी | ५० | |
| १९ | पालघर | १०० | |
| २० | पुणे | १०० | |
| २१ | बीड | ५० | |
| २२ | बुलढाणा | ५० | |
| २३ | भंडारा | ५० | |
| २४ | मुंबई उपनगर | १०० | |
| २५ | मुंबई शहर | १०० | |
| २६ | यवतमाळ | ५० | |
| २७ | रत्नागिरी | १०० | |
| २८ | रायगड | १०० | |
| २९ | लातूर | ५० | |
| ३० | वर्धा | ५० | |
| ३१ | वाशिम | ५० | |
| ३२ | सांगली | ५० | |
| ३३ | सातारा | ५० | |
| ३४ | सिंधुदुर्ग | १०० | |
| ३५ | सोलापूर | ५० | |
| ३६ | हिंगोली | ५० | |
| | **एकूण** | **२२५०** | |